**महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर, विद्यापीठाचे वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील वाढीव खर्चासाठी पुनर्विनियोजनाद्वारे निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११७/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक: एनएलयु-२०१६/प्र.क्र.१०५/विशि-२, दि.२७.०३.२०१८.
२) विभागाचा समक्रमांकाचा दि.०१.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय.
३) विभागाचा समक्रमांकाचा दि.२१.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपुर हे दि.०१ एप्रिल, २०१६ पासून सुरु झालेले आहे. मा.मंत्रिमंडळाच्या दि.१५.०३.२०१८ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा, जि.नागपूर येथे ६० एकर जागेत विधी विद्यापीठाचे ग्रंथालय, शैक्षणीक संकुल, प्रशासकीय संकुल, विद्यापीठाची संरक्षक भिंत, प्रवेशद्वार व अंतर्गत रस्ते तसेच कुलगुरुसाठी निवासस्थान इत्यादी इमारती बांधकामासाठी रु.२३१,४४,९०,१७७/- किंमतीच्या अंदाजपत्रकास वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, सदर अंदाजपत्रकात भाववाढ व सेंटेज चार्जेस यांचा समावेश नव्हता, त्याचप्रमाणे जीएसटीचा दर १२% च्या ऐवजी १८ % आवश्यक होता. त्यानुसार जीएसटी फरक, सेंटेज चार्जेस, भाववाढ व परिमाणातील वाढ या सर्वाची किंमत रु.२८,४५,८०,०००/- एवढी येत आहे. या वाढीनुसार वाढीव खर्च **रु.२८,४५,८०,०००/-** या रक्कमेचे शासन दायित्व घेण्यास व त्याचप्रमाणे मूळ प्रशासकीय मान्यतेमध्ये वाढीव खर्चाचा समावेश करुन रु.२५९,९०,७०,१७७/- इतक्या रक्कमेच्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता वाचा क्र.२ येथील दि.०१.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नुषंगाने महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर येथील बांधकामातील जीएसटी फरक, सेंटेज चार्जेस, भाववाढ व परिमाणातील वाढ या सर्व बाबींच्या खर्चासाठी **रु.२८,०५,७९,०००/-** एवढा निधी वाचा क्र.३ येथील दि.२१.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता उर्वरित रक्कम पुर्नविनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर येथील बांधकाम क्र.१ येथील जीएसटी फरक, सेंटेज चार्जेस, भाववाढ व परिमाणातील वाढ या सर्व बाबींच्या खर्चासाठी उर्वरित रक्कम रु.४०,०१,०००/- (चाळीस लक्ष एक हजार फक्त) एवढा निधी पुनर्विनियोजनाद्वारे खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

२. **अटी व शर्ती :-**
१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.
२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.
३. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. सदर कामाचा खर्च "मागणीक्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२-विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करीता मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, नियोजन व वित्त विभागाचा अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.१३७/१४७१, दि.१९.०३.२०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र.४४६/२०२४/व्यय-५, दि.२६.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२८१९१७०३३४०८ असा आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD
SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c66207630576336152194ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.28 19:26:51 +05'30'

**(शरद कोकाटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. कुलपती महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
३. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
४. उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
७. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सहसंचालक (उच्च शिक्षण),नागपूर विभाग, नागपूर.
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२,महाराष्ट्र, नागपूर.
११. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२,महाराष्ट्र, नागपूर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.

१४. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१६. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८. उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.